**सदस्य सचिव, स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समिती, मंत्रालय, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील "लिपिक-टंकलेखक" पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि २५१९/प्र.क्र.१३१/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २५ ऑक्टोबर, २०१९

**शासन आदेश**

श्री.शि.रा.आव्हाड, लिपिक-टंकलेखक, जलसंपदा विभाग यांच्या सेवा सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील सदस्य सचिव, स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समिती, नविन प्रशासन भवन, ८ वा मजला, मंत्रालय, मुंबई-४०००३२ या कार्यालयात "लिपिक-टंकलेखक" या पदावर खालील अटींच्या अधीन राहून प्रथमत: २ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने सुपूर्द करण्यात येत आहेत.

(अ) ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार सुपूर्द करील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला संबंधित कर्मचारी आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारील त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर, प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्याला परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/संवर्ग नियंत्रण अधिकारी/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर, त्याला मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्याने मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्याला मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

(ई) तसेच संबंधित कर्मचाऱ्याच्या सेवा मूळ कार्यालयास प्रत्यावर्तीत केल्यानंतर ते परस्पर अन्य मंत्री कार्यालयात/अन्य कार्यालयाच्या आस्थापनेवर नियुक्त्या करण्यास पात्र नाहीत.

२. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा...इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक १७-१२-२०१६ व १६-०२-२०१८ मधील तरतुदी विचारात घेऊन, जलसंपदा विभागाने प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती याबाबत सामान्य प्रशासन विभाग/स्वा.सै.कक्ष-१ यांच्याशी सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

३. श्री. आव्हाड, लिपिक-टंकलेखक, जलसंपदा विभाग यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी त्यांचे प्रशासकीय विभाग आणि सामान्य प्रशासन विभाग/स्वा.सै.कक्ष-१ यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

४. श्री. आव्हाड, यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी विभागाने तत्काळ कार्यमुक्त करावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०२५१५५३३२९६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2019.10.25 15:55:52 +05'30'

**( ग. भि. गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.शि.रा.आव्हाड, लिपिक-टंकलेखक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई (विभागामार्फत)

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) सदस्य सचिव, स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समिती, नविन प्रशासन भवन, ८ वा मजला, मंत्रालय, मुंबई-४०००३२
४) सह/उप सचिव (आस्थापना), जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई ४०००३२.
त्यांना विनंती करण्यात येते की, श्री. शि.रा.आव्हाड, लिपिक-टंकलेखक यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देताना परिच्छेद ३ व ४ मध्ये नमूद केल्यानुसार कार्यवाही करुन काढण्यात आलेल्या आदेशाची प्रत या कार्यासनाकडे तत्काळ पाठविण्यात यावी.
५) सह/उप सचिव (स्वा.सै.कक्ष-१), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
त्यांना विनंती करण्यात येते की, श्री. आव्हाड, लिपिक-टंकलेखक यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने त्वरेने उपलब्ध होतील याबाबत त्यांनी जलसंपदा विभागाकडे पाठपुरावा करावा.
६) सा.प्र.वि./का.क्र.१४-अ (संग्रहार्थ/निवड नस्ती).